**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:-पीटीसी-२०२४/प्र.क्र.६०/टीएनटी-४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२,
दिनांक:-२८ऑगस्ट,२०२४.

**संदर्भ :-**१) सहसचिव ( Inst.& Trng.) भारत सरकार,शिक्षण मंत्रालय,शालेय शिक्षण व साक्षरता विभाग यांचे पत्र क्रमांक-एफ.१-७/२०२४-NAT, दिनांक २७ जून,२०२४ चे पत्र व त्यासोबतचे सहपत्र.
२) सहसंचालक (NAT),भारत सरकार,शिक्षण मंत्रालय,शालेय शिक्षण व साक्षरता विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-१-४४/२०२४-NAT दिनांक २७ ऑगस्ट,२०२४.

**परिपत्रक:-**

प्रतिवर्षी केंद्र शासनाकडून विविध राज्यातील प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांना राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार जाहीर केले जातात. सन २०२४ चे राष्ट्रीय शिक्षक पुरस्कारासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधिन क्र.१,दिनांक २७ जून,२०२४ च्या अनुषंगाने सहा शिक्षकांची नामांकने ऑनलाईन पोर्टलद्वारे केंद्र शासनास कळविण्यात आली होती.

२. सन २०२४ च्या राष्ट्रीय शिक्षक पुरस्कारासाठी राज्यातील श्री.मंथैह चीन्नी बेडके (MANTAIAH CHINNI BEDKE), शिक्षक, जिल्हा परिषद उच्च प्राथमिक शाळा जाजवंडी, जाजवंडी ४४२७०४ व श्री.सागर चितरंजन बगाडे (SAGAR CHITTARANJAN BAGADE), शिक्षक, सौ. एस.एम. लोहिया हायस्कूल आणि ज्युनियर कॉलेज, कोल्हापूर, कोल्हापूर ४१६०१२ या दोन शिक्षकांची निवड केल्याचे केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक २७ ऑगस्ट,२०२४ च्या पत्रान्वये कळविले आहे.

३. राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार वितरण समारंभ विज्ञान भवन, नवी दिल्ली येथे दिनांक ०५ सप्टेंबर,२०२४ रोजी होणार आहे.

४. सदर पुरस्कार्थी निवासाबाबतची माहिती सहसचिव (NAT) शिक्षण मंत्रालय, भारत सरकार यांच्या दि. २७.०८.२०२४ रोजीच्या पत्रात नमूद केल्यानुसार राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार्थी यांना कळविण्याची कार्यवाही शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी करावी.

**५.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०८२८१६२१४१९८२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SIDDHESHWAR
KISAN SAPKAL

Digitally signed by SIDDHESHWAR KISAN SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=db42cf8a91b869b103e6e107753b6bb34fc469e07c99e0703ba8560eaca00b19, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=80124DE9F22650026F4F18C12640F0BA35AB131CAEE127F00EE6CD16619FE883, cn=SIDDHESHWAR KISAN SAPKAL
Date: 2024.08.28 16:36:20 +05'30'

**( सिध्देश्वर सपकाळ )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

**१.**आयुक्त (शिक्षण)महाराष्ट्र राज्य,पुणे.
**२.**शिक्षण संचालक(माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे.
**३.**शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे.
४.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
**५.**सर्व जिल्ह्यांचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना)/सर्व शिक्षण निरीक्षक,बृहन्मुंबई.
**६.**मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मुख्यमंत्री कार्यालय,मंत्रालय,मुंबई.
**७.**मा.मंत्री,शालेय शिक्षण,मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव.
८.प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई.
९.सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई.
**१०.**अपर मुख्य सचिव,ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक,बांधकाम भवन,मर्झबान रोड,मुंबई.
**११.**मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,गडचिरोली/कोल्हापूर यांना शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे मार्फत.
**१२.**पुरस्कार विजेते शिक्षक यांना शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे मार्फत.
**१३.**निवड नस्ती(टीएनटी-४).